**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालये/संस्था मध्ये घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या कनिष्ठ अधिव्याख्याता यांना प्रदान करावयाच्या मानधनाचे दर सुधारित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/(७५/२१)/(२)/मशि-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ ऑक्टोबर, २०२१.

वाचा : शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक- एससीपी-२००८/(१४३/०८)/मशि-२, दिनांक २८ जानेवारी, २००९.

प्रस्तावना :

उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अख्यत्यारितील उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयात एखाद्या विषयासाठी अर्धवेळ शिक्षकासाठी आवश्यक असलेला कार्यभार उपलब्ध होऊ शकत नसल्यास अशा विषयाच्या अध्यापनासाठी घडयाळी तासिका तत्वावर अधिव्याख्यात्यांची नेमणूक करण्यात येते. संदर्भाधिन शासन निर्णयान्वये उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयातील घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या अधिव्याख्यात्यांना लागू करण्यात आलेल्या मानधनाच्या दरात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय कनिष्ठ महाविद्यालयातील घडयाळी तासिका तत्वावर कार्यरत असलेल्या अधिव्याख्यात्यांच्या मानधनाच्या दरात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कनिष्ठ अधिव्याख्याता | दि. २८/०१/२००९ च्या शा.नि. अन्वये अनुज्ञेय दर (प्रति घडयाळी तास) | सुधारीत दर (प्रति तास) |
|---|---|---|---|
| १ | प्रशिक्षित कनिष्ठ अधिव्याख्याता | रु.७२/- | रु.१५०/- |
| २ | अप्रशिक्षित कनिष्ठ अधिव्याख्याता | रु.५४/- | रु.१२०/- |

२. सदरहू सुधारित दर दिनांक ०१ ऑक्टोंबर, २०२१ पासून अनुज्ञेय होतील.

३. याकरीता होणारा खर्च हा मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.८२०/२०२१/व्यय-५, दिनांक ०८/०९/२०२१ नुसार प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२११०२२१८३५०९५७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Hemantkumar Pandharinath Baviskar

Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, cn=Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2021.10.22 18:37:39 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. सहसंचालक, उच्च शिक्षण, सर्व विभागीय कार्यालये, महाराष्ट्र राज्य.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी.
८. निवड नस्ती, मशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.